सातव्या वेतन आयोगामध्ये तीन लाभांच्या सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेचा पहिला लाभ मंजूर करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

**सामान्य प्रशासन विभाग,**

**शासन आदेश क्र. मावज-२०२३/५७८/प्र.क्र.१३२/मावज-२**

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,

दिनांक :- २८ मे, २०२४.

**संदर्भ :-** १) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. वेतन १९९९/प्र.क्र.२/सेवा.३, दि. २०.७.२००१

२) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. वेतन ११०९/प्र.क्र.४४/सेवा.३, दि. १.४.२०१०

३) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. वेतन १११९/प्र.क्र.३/सेवा.३, दि. २.३.२०१९

**शासन आदेश :**

वित्त विभागाच्या संदर्भ क्र.३ येथील दिनांक २.३.२०१९ च्या शासन निर्णयान्वये १०, २० व ३० वर्षाच्या नियमित सेवेनंतरची, तीन लाभांची सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजना ही दिनांक १.१.२०१६ पासून लागू करण्यात आली आहे.

वित्त विभागाच्या दिनांक २.३.२०१९ च्या शासन निर्णयान्वये अधिकाऱ्यांना १०, २०, व ३० वर्षाच्या नियमित सेवेनंतर पहिला, दुसरा व तिसरा लाभ अनुज्ञेय करण्याची तरतूद आहे.

२. उपरोक्त तरतूदीनुसार सामान्य प्रशासन विभागाच्या अधिनस्त असलेल्या माहिती व जनसंपर्क महासंचालनालयातील आश्वासित प्रगती योजनेंतर्गत त्यात नमूद केलेल्या अटी व शर्तींची पूर्तता करणाऱ्या **"वरिष्ठ सहायक संचालक (माहिती) / जिल्हा माहिती अधिकारी / वरिष्ठ उपसंपादक (माहिती) / जनसंपर्क अधिकारी गट -अ (कनिष्ठ),"** संवर्गातील सोबतच्या यादीत परिशिष्ट-अ मध्ये नमूद केलेल्या अधिकाऱ्यांना तीन लाभांच्या सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेंतर्गत लाभ मंजूर करण्यात येत आहे. परिशिष्ट- अ मधील अधिकाऱ्यांना गट-अ (वरिष्ठ) एस २३: ६७७००-२०८७०० ही वेतनश्रेणी मंजूर करण्यात येत आहे.

३. तीन लाभांच्या सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेच्या लाभामुळे लाभ मंजूर करण्यात आलेल्या कर्मचाऱ्यांच्या जबाबदारी आणि कर्तव्यात वाढ होत नसली तरी नियमित पदोन्नतीप्रमाणे त्यांना वरिष्ठ पदाच्या वेतनश्रेणीत वेतननिश्चतीचा लाभ देण्यात येत असल्याने सदर वेतनश्रेणीत त्यांना भविष्यात नियमित ( कार्यात्मक ) पदोन्नती मिळाल्यावर पुन्हा: वेतननिश्चितीचा लाभ देय होणार नाही.

४. सदर कर्मचाऱ्यांचे नाव कनिष्ठ (मूळ) संवर्गाच्या ज्येष्ठता सूचीत राहील आणि सेवा प्रवेश नियमातील तरतूदीनुसार उपलब्ध रिक्त पदावर योग्य वेळी नियमित पदोन्नतीसाठी त्यांच्या नावांचा विचार करण्यात येईल. सदर लाभ मंजूर केल्यानंतर कर्मचाऱ्याने नियमित पदोन्नती नाकारल्यास अथवा पदोन्नतीसाठी अपात्र ठरल्यास या योजनेअंतर्गत दिलेला उपरोक्त पदोन्नतीचा लाभ त्याला मिळणार नाही व त्यास त्याच्या मूळच्या पदावर पदावनत करण्यात येईल.

५. सदर कर्मचाऱ्यांना त्यांना वर नमूद केलेल्या अटी मान्य असल्याचे बंधपत्र सादर करावे. तसेच या आदेशाच्या अनुषंगाने वरिष्ठ वेतनश्रेणीमध्ये वेतननिश्चिती करण्यासाठी संबंधित कर्मचाऱ्यांनी सदर आदेशाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत विकल्प द्यावा, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय यांनी अधिकाऱ्यांच्या पदोन्नतीच्या पदाच्या वेतन संरचनेतील वेतन निश्चिती त्यांनी दिलेल्या विकल्पानुसार करुन त्यांना या योजनेचा लाभ त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या दिनांक व वेतन संरचनेनुसार देण्यात यावा.

६. उपरोक्त अधिकाऱ्यांना ५०-५५ चा पुर्नविलोकनाचा प्रस्ताव शासनास प्राप्त झालेला नसल्यामुळे सदर अधिकाऱ्यांना ५०-५५ चे पुर्नविलोकन करण्याच्या अधिन राहून तसेच उपरोक्त अधिकाऱ्यांच्या सेवेतील मूळ नियुक्तीच्या प्रकरणी मा. उच्च न्यायालयात प्रलंबित असलेल्या याचिकेच्या अधिन राहून तसेच शासनाच्या मान्यतेच्या अधिन राहून उक्त अधिकाऱ्यांस आश्वासित प्रगती योजनेचा लाभ देण्यात येत आहे.

७. हा शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक सांकेतांक क्र. २०२४०५२८१५४७३८७६०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्य आदेशानुसार व नावाने.

VIJAY MAROTRAO NANDEKAR

Digitally signed by VIJAY MAROTRAO NANDEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=1b335601da651693303a45db809973b127e2048acba707f3af981bf515548266, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=62861E2C588076DA807403FE9012F19FCC79CFD621047A784178829F75A0C6F2, cn=VIJAY MAROTRAO NANDEKAR
Date: 2024.05.28 16:00:20 +05'30'

**( विजय नांदेकर )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**सोबत : जोडपत्र "अ"**

**प्रति,**

१. प्रधान सचिव (मा.व ज.), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
३. उप सचिव, सामान्य प्रशासन विभा, मंत्रालय, मुंबई-३२
४. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
५. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व परिक्षा), मुंबई / नागपूर,
६. संचालक (माहिती) (प्रशासन), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
७. संचालक (माहिती) (वृत्त व जनसंपर्क), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
८. संचालक (माहिती), नागपूर-अमरावती विभाग, नागपूर,
९. संचालक (माहिती), मराठवाडा विभाग, छत्रपती संभाजीनगर,
१०.उप संचालक (लेखा), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
११.अधिपरिक्षक, पुस्तके व प्रकाशने, मुंबई,
१२.संबंधित अधिकारी (मावज मार्फत),
१३.सर्व जिल्हा माहिती कार्यालये,
१४.सर्व जिल्हा कोषागार कार्यालये,
१५.निवडनस्ती.

परिशिष्ट- "अ"

सामान्य प्रशासन विभाग कार्यालयीन आदेश क्रमांक : मावज-२०२३/५७८/प्र.क्र.१३२/मावज-२
दिनांक:- २८ / ५ / २०२४ चे जोडपत्र.

वरिष्ठ सहायक संचालक (माहिती) / जिल्हा माहिती अधिकारी /वरिष्ठ उपसंपादक (माहिती) / जनसंपर्क अधिकारी, गट -अ (कनिष्ठ), एस २० : ५६१००-१७७५०० पदावर नियमित सेवेनंतर सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेंतर्गत आश्वासित प्रगती योजनेंतर्गत उपसंचालक (माहिती), गट -अ एस २३ : ६७७००-२०८७०० पदाची वरिष्ठ वेतनश्रेणी देण्यासाठी पात्र ठरलेले अधिकारी.

| अ.क्र | नाव | ज्या पदावरुन लाभ अनुज्ञेय करावयाचा आहे ते पद व वेतनश्रेणी | ज्या पदाची वरिष्ठ वेतनश्रेणी लागू करायची आहे ते पद व वेतनश्रेणी | वरिष्ठ वेतनश्रेणी लागू करावयाचा दिनांक |
|---|---|---|---|---|
| १ | श्री. बागुल हेमराज काशीनाथ | वरिष्ठ सहायक संचालक (माहिती) एस २० : ५६१००-१७७५०० | उपसंचालक (माहिती), एस २३ : ६७७००-२०८७०० | १४-७-२०१८ |
| २ | श्री. गांगुर्डे किशोर रमेश | वरिष्ठ सहायक संचालक (माहिती) एस २० : ५६१००-१७७५०० | उपसंचालक (माहिती), एस २३ : ६७७००-२०८७०० | १-८-२०१८ |
| ३. | श्रीमती जोगळेकर मीनल शशिकांत | वरिष्ठ सहायक संचालक (माहिती) एस २० : ५६१००-१७७५०० | उपसंचालक (माहिती), एस २३ : ६७७००-२०८७०० | १८-७-२०१८ |
| ४ | श्री. मोघे किरण जनार्दन | वरिष्ठ सहायक संचालक (माहिती) एस २० : ५६१००-१७७५०० | उपसंचालक (माहिती), एस २३ : ६७७००-२०८७०० | २३-१-२०१९ |
| ५ | श्रीमती आंधळे वर्षा संतोष | वरिष्ठ सहायक संचालक (माहिती) एस २० : ५६१००-१७७५०० | उपसंचालक (माहिती), एस २३ : ६७७००-२०८७०० | १४-७-२०१८ |
| ६ | श्रीमती मोहरील किर्ती प्रकाशराव | वरिष्ठ सहायक संचालक (माहिती) एस २० : ५६१००-१७७५०० | उपसंचालक (माहिती), एस २३ : ६७७००-२०८७०० | १८-७-२०१८ |
| ७ | श्री. पाटील देवेंद्र लक्ष्मण | वरिष्ठ सहायक संचालक (माहिती) एस २० : ५६१००-१७७५०० | उपसंचालक (माहिती), एस २३ : ६७७००-२०८७०० | १४-७-२०१८ |
| ८ | श्री. टाके प्रविण कृष्णराव | वरिष्ठ सहायक संचालक (माहिती) एस २० : ५६१००-१७७५०० | उपसंचालक (माहिती), एस २३ : ६७७००-२०८७०० | ७-८-२०१८ |